जनहित याचिका क्र. ६०/२०१८ च्या संदर्भात मा. उच्च न्यायालय, खंडपीठ नागपूर यांनी दिलेल्या निर्देशाच्या अनुषंगाने समिती स्थापन करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्रमांक- न्यायाप्र-२०१८/प्र.क्र.१४८/रस्ते-४अ,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक- २६ सप्टेंबर, २०१८

**प्रस्तावना-**

यवतमाळ जिल्हयातील नागपूर-बोरी तुळजापूर प्र.रा.मा.क्र.६ च्या यवतमाळ शहरातील बस स्टँड ते वनवासी मारोती मंदीरापर्यंतच्या सिमेंट कॉंक्रीट रस्त्याच्या निकृष्ट कामाची चौकशी करणे तसेच संबंधीत कंत्राटदाराला काम करु न देण्याबाबत संबंधीतांना सूचना देणे बाबत, श्री. दिगंबर हरीभाऊ पजगाडे, जि. यवतमाळ यांनी महाराष्ट्र शासन व इतर यांच्या विरुध्द मा.उच्च न्यायालय, खंडपीठ नागपूर येथे जनहित याचिका क्र.६०/२०१८ दाखल केली आहे. सदर याचिकेच्या अनुषंगाने मा.उच्च न्यायालय, खंडपीठ नागपूर येथे दि.२९.०८.२०१८ रोजी झालेल्या सुनावणी दरम्यान मा. उच्च न्यायालयाने आदेश पारीत केले आहेत. सदर आदेशामध्ये मा. उच्च न्यायालयाने सदर प्रकरणी शासनाने चार आठवडयात चौकशी समिती नेमून पुढील तीन महिन्यात चौकशी प्रक्रीया पूर्ण करुन दोषींवर कार्यवाही करणे बाबत निर्देश दिले आहेत.

**शासन निर्णय-**

मा.उच्च न्यायालय, खंडपीठ नागपूर यांनी जनहित याचिका क्र.६०/२०१८ च्या अनुषंगाने दि.२९.०८.२०१८ रोजी दिलेल्या आदेशास अनुसरुन पुढील प्रमाणे चौकशी समिती स्थापन करण्यात येत आहे.

| अ. क्र. | अधिका-याचे पदनाम | शेरा |
|---|---|---|
| १. | मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नागपूर. | अध्यक्ष |
| २. | अधिक्षक अभियंता, दक्षता व गुणनियंत्रण मंडळ, नागपूर. | सदस्य |
| ३. | अधिक्षक अभियंता, दक्षता व गुणनियंत्रण मंडळ, अमरावती. | सदस्य सचिव |

२. सदर समितीने मा. उच्च न्यायालय, खंडपीठ नागपूर यांनी दिलेल्या निर्देशानुसार आवश्यक ती चौकशी विहीत मुदतीत पूर्ण करुन त्याबाबतचा अहवाल तीन महिन्यात शासनास सादर करावा.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र. २०१८०९२६१२३६५८४५१८ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Tanaji Shankar Shelke

Digitally signed by Tanaji Shankar Shelke
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ff297c5a2378c5688902d6a48db66496180f7476fe69631418ba9d1a9a172e2e, cn=Tanaji Shankar Shelke
Date: 2018.09.26 12:41:53 +05'30'

**( ता. शं. शेळके )**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रती,**

१) मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मुख्यमंत्री सचिवालय, मंत्रालय, मुंबई.
३) मा. मंत्री, सार्वजनिक बांधकाम विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) मा. राज्यमंत्री, सार्वजनिक बांधकाम विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५) प्रधान सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
६) सचिव (रस्ते), सार्वजनिक बांधकाम विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
७) सचिव (बांधकामे), सार्वजनिक बांधकाम विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
८) उप सचिव (रस्ते), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
९) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, अमरावती.
१०) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नागपूर.
११) अधिक्षक अभियंता, दक्षता व गुण नियंत्रण मंडळ, नागपूर.
१२) अधिक्षक अभियंता, दक्षता व गुण नियंत्रण मंडळ, अमरावती.
१३) अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, यवतमाळ.
१४) कार्यकारी अभियंता, विशेष प्रकल्प (सा.बां.) विभाग, यवतमाळ.
१५) संग्रहार्थ- कार्यासन- रस्ते-४अ.